# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

शासन निर्णय क्रमांक : विसयो - २०११ / प्र. क्र. १२७ / विसयो-२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ३१ ऑक्टोबर, २०११.

**वाचा :** शासन निर्णय क्रमांक : विसयो - २०१० / प्र. क्र. १७५ / विसयो-२, दिनांक २६ ऑक्टोबर, २०१०.

**प्रस्तावना :**

विशेष सहाय्य योजनेबाबत मार्गदर्शक सूचना संदर्भाधिन शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या आहेत. तथापि, यामधील काही बाबी संदर्भात लोकप्रतिनिधींकडून प्राप्त झालेली निवेदने, विविध संस्थाकडून प्राप्त झालेली निवेदनें, क्षेत्रिय कार्यालयांकडून प्राप्त झालेल्या सूचना विचारात घेऊन योजनेतील निकषांमध्ये काही सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. याबाबत सर्वकष विचार करून शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

**(१) संजय गांधी निराधार अनुदान योजना समितीच्या सदस्य सचिव पदी तहसिलदार किंवा नायब तहसिलदार राहतील.**

**(२) इंदिरा गांधी राष्ट्रीय वृध्दापकाळ निवृत्तीवेतन योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेंअंतर्गत लाभार्थ्यांचे अर्ज संजय गांधी निराधार अनुदान योजना समितीच्या मान्यतेकरिता सादर करणे.**

सध्या श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना, इंदिरा गांधी राष्ट्रीय वृध्दापकाळ निवृत्ती वेतन योजने अंतर्गत लाभार्थ्यांचे अर्ज मंजूरीकरिता उप विभागीय अधिकारी (महसूल) यांचेकडे पाठविण्यात येतात. तथापि, उप विभागीय अधिकाऱ्यांना आपल्या इतर कामांमधून वेळ मिळत नसल्याने, इंदिरा गांधी राष्ट्रीय वृद्धापकाळ निवृत्तीवेतन योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजने मधील अर्ज फक्त तहसिलदारांपर्यंत छाननी / पडताळणी करीता सादर करावेत व त्यानंतर सदर अर्ज संजय गांधी निराधार अनुदान योजना समितीसमोर मंजूरीकरीता ठेवण्यात यावेत. संजय गांधी निराधार अनुदान योजना समितीने मंजूरी दिलेल्या सर्व लाभार्थ्यांच्या यादीचे, त्या त्या गावातील ग्राम सभेसमोर वाचन करण्यात यावे.

**(३) शेतमजूर महिलांमधील पात्र महिलांना संजय गांधी निराधार अनुदान योजनेमध्ये लाभ देणे.**

दिनांक २६ ऑक्टोबर, २०१० च्या शासन निर्णयान्वये संजय गांधी निराधार अनुदान योजनेसाठी पात्र लाभार्थ्यांच्या यादीतून "शेत मजूर महिला" हा प्रवर्ग वगळण्यात आला आहे. तथापि, क्षेत्रिय कार्यालयांनी शेतमजूर महिला या प्रवर्गामध्ये लाभ मिळणाऱ्या सर्व महिलांचा लाभ बंद केला. वास्तविक ज्या शेतमजूर महिला संजय गांधी निराधार अनुदान योजनेच्या निकषात बसत होत्या त्यांना तपासणी करून, लाभ चालू ठेवणे आवश्यक होते. त्यामुळे शेतमजूर महिलांमधील ज्या निराधार, विधवा, परित्यक्त्या शेतमजूर महिला संजय गांधी निराधार अनुदान योजनेच्या पात्रतेच्या निकषात बसत आहेत अशा शेतमजूर महिलांना तपासणी करून, संजय गांधी निराधार अनुदान योजने अंतर्गत त्यांचा लाभ सुरू करण्यात यावा.

**(४) वयाचा दाखला**

ग्रामीण / नागरी रुग्णालयाच्या शासकीय वैद्यकीय अधिकाऱ्यांनी अर्जदाराचे रेशनकार्ड, मतदार ओळखपत्र, जन्म-मृत्यू नोंद इ. पुरावे तपासून वयाचा दाखला द्यावा. वैद्यकीय प्रमाणपत्राच्या आधारे नमूद केलेले वय व सकृतदर्शनी दिसणारे वय यामध्ये तफावत नसेल याचीही दक्षता घेण्यात यावी.

सर्वच वयाच्या दाखल्यावर वैद्यकिय अधिकाऱ्याचे नाव, त्याचा नोंदणी क्रमांक व या दाखल्याला कोणत्या जिल्हा वैद्यकीय मंडळासमोर आव्हान देता येईल याची नोंद वैद्यकीय प्रमाणपत्रात नमूद करणे आवश्यक आहे. अशी सुधारित वैद्यकीय प्रमाणपत्रे शासन स्तरावरून निश्चित करून देण्यात येतील.

(५) एडस् (एच. आय. व्ही.) ग्रस्त व तृतीयपंथीय प्रवर्गाखाली संजय गांधी निराधार अनुदान योजनेचा लाभ मिळण्याकरीता अर्जासोबत सक्षम वैदयकीय अधिकाऱ्यांचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहिल.

(६) याशिवाय शासन निर्णय दिनांक २६ ऑक्टोबर, २०१० च्या अनुषंगाने संजय गांधी निराधार अनुदान योजनेंतर्गत खालील प्रवर्गास लाभ देण्यात यावा.

(अ) तुंरुगात शिक्षा भोगत असलेल्या कुटुंबप्रमुखाच्या पत्नीस या योजनेचा लाभ देण्यात यावा. (कौटुंबिक वार्षिक उत्पन्नाची मर्यादा रुपये २१,०००/- इतकी राहील.)

(ब) १८ वर्षाखालील अनाथ, अंपग, सिकलसेलग्रस्त व अन्य दुर्धर आजाराने ग्रस्त मुले / मुली असतील तर त्यांना पालका मार्फत लाभ देण्यात यावा. (कौटुंबिक वार्षिक उत्पन्नाची मर्यादा रुपये २१,००० /- इतकी राहील.)

(क) ३५ वर्षे व त्यावरील वयाची अविवाहीत स्त्री, जर तिला कुठलाही आधार नसेल व या योजनेच्या उत्पन्न मर्यादेत ती बसत असेल (कौटुंबिक वार्षिक उत्पन्नाची मर्यादा रुपये २१,०००/- इतकी राहील.) तर तिला लाभ देण्यात यावा. मात्र तिचा विवाह झाल्यास ती स्वत:हून लाभ बंद करण्यास अर्ज करेल, असे बंधपत्र घेण्यात यावे.

(ड) घटस्फोटीत मुस्लिम स्त्री बाबत तिच्या सासर किंवा माहेरच्या वास्तव्याच्या परिसरातील मस्जिदमधील काझीने तहसिलदारासमोर त्या स्त्रीच्या घटस्फोटा संदर्भात तहसिलदारासमोर शपथ पत्र सादर करणे आवश्यक राहील. अथवा गावामध्ये / शहरामध्ये मुस्लीम समाजासाठी धार्मिक कार्य करण्यासाठी जी रजिस्टर संस्था असेल त्या संस्थेने ठराव करून दिल्यास त्यानंतर तिला संजय गांधी निराधार अनुदान योजनेच्या पात्रतेच्या निकषांत बसत असेल तर या योजनेचा लाभ दयावा.

सर्व क्षेत्रिय कार्यालयाना निर्देशित करण्यात येते की, सदर आदेशाची अंमलबजावणी तात्काळ करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( दिनेश वाघमारे )
सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव
मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव
मा. उप मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव
सर्व जिल्हयांचे पालक मंत्री
सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव
सर्व राज्यमंत्र्यांचे खाजगी सचिव
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
सचिव, ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार, कृषि भवन, नवी दिल्ली
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
संचालक, नागरी प्रशासन, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई
वित्त विभाग (व्यय-१४ / अर्थसंकल्प -७ ), मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग / सर्व विभागीय आयुक्त / सर्व महापालिका आयुक्त / सर्व पोलीसआयुक्त
सर्व जिल्हाधिकारी / सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक / सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी व लेखा कार्यालय, मुंबई
विभागीय समाजकल्याण अधिकारी (मुंबई / नाशिक / पुणे / औरंगाबाद / अमरावती / नागपूर)
सर्व उप विभागीय उप जिल्हाधिकारी (प्रांत अधिकारी) / सर्व तहसिलदार
सर्व कोषागार अधिकारी / उप कोषगार अधिकारी / सर्व पंचायत समितींचे गट विकास अधिकारी
सर्व अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती / कार्यासन विसयो-२.

--------



201112071215350001